**जागतिक बँक सहाय्यित नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्पास डॉलर्सच्या विनिमय दरामधील फरकामुळे उपलब्ध होणाऱ्या निधीस तसेच प्रकल्पावरील निश्चित दायित्व वाढीमुळे प्रकल्पासाठी अतिरिक्त निधी उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : नादेकृ ४६२२/प्र.क्र. ९४/८अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - ११ जुलै, २०२३

वाचा : १) शासन निर्णय क्र. हअप्र-०७१६/प्र.क्र.८२/राकृवियो कक्ष,दि.१७ जानेवारी, २०१८
२) शासन निर्णय क्र. हअप्र-०७१६/प्र.क्र.८२/८अे, दि.१७ फेब्रुवारी, २०२२

**प्रस्तावना** -:

हवामान बदलास अतिसंवेदनशील असलेल्या विदर्भ, मराठवाड्यातील ४६८२ गावे (विदर्भातील पूर्णा नदीच्या खोऱ्यातील खारपाण पट्टयातील ९३२ गावांसह) तसेच जळगाव जिल्ह्यातील ४६० गावे अशा एकूण ५१४२ गावांमध्ये सन २०१८ पासून जागतिक बँकेच्या अर्थसहाय्याने रू.४००० कोटी अंदाजित खर्चाचा नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये राबविण्यात येत आहे. या प्रकल्पामध्ये निवडण्यात आलेल्या ५१४२ गावांपैकी विविध कारणांमुळे प्रकल्पाची अंमलबजावणी करणे शक्य नसलेल्या ६४ गावांऐवजी नाशिक जिल्हयातील मालेगाव तालुक्यातील सर्व गावांचा समावेश या प्रकल्पामध्ये करण्यास संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

२. नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्पाची एकूण किंमत ६०० दशलक्ष डॉलर्स (रु.४००० कोटी) असून त्यामध्ये जागतिक बँकेचा हिस्सा ७० टक्के (रु.२८०० कोटी) (४२० दशलक्ष डॉलर्स) व राज्य शासनाचा हिस्सा ३० टक्के (रु.१२०० कोटी)( १८० दशलक्ष डॉलर्स) आहे. राज्य शासनाने निधी उपलब्ध करून दिल्यानंतर जागतिक बँकेचा निधी प्रतिपुर्तीच्या स्वरुपात प्राप्त होतो. डॉलर्स व रुपयाच्या विनिमय दरात झालेल्या फरकामुळे प्रकल्प मूल्य रु.४६९० कोटी इतके होते. तर प्रकल्पावरील निश्चित दायित्वामुळे प्रकल्पाचा एकूण खर्च रु.५४६९ कोटी इतका होणार आहे. प्रकल्पाच्या मूळ रु.४००० कोटी रकमेमध्ये डॉलर्सच्या विनिमय दरानुसार झालेल्या वाढीमुळे रु.६९० कोटी अतिरिक्त निधी उपलब्ध होऊ शकतो यामध्ये जागतिक बँकेचे रु.४८३ कोटी कर्ज व राज्य हिस्सा रु.२०७ कोटी इतका असेल, हा रु.६९० कोटी अतिरिक्त निधी तसेच प्रकल्पाचे उर्वरित दायित्व पुर्ण करण्यासाठी रु.७७९ कोटी निधी याप्रमाणे एकूण रु.१४६९ कोटी निधी राज्य शासनाच्या एकत्रित निधीतून उपलब्ध करुन देण्याची बाब विचाराधीन होती.

३. जागतिक बँक सहाय्यित नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्पास डॉलर्सच्या विनिमय दरामधील फरकामुळे उपलब्ध होणाऱ्या निधीस तसेच प्रकल्पावरील निश्चित दायित्व वाढीमुळे प्रकल्पासाठी अतिरिक्त निधी उपलब्ध करुन देण्यासाठीच्या प्रस्तावास मा.मंत्रिमंडळाच्या दि. २८ जून, २०२३ रोजी झालेल्या बैठकीत मान्यता दिलेली आहे. याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे :-

**शासन निर्णय :-**

(१) नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्पाच्या मूळ रु.४००० कोटी (६०० दशलक्ष डॉलर्स) व्यतिरिक्त डॉलर्सच्या विनिमय दरातील फरकामुळे झालेली रु.६९० कोटी (रुपये सहाशे नव्वद कोटी फक्त) वाढ, त्याचप्रमाणे प्रकल्पावर निर्माण झालेल्या निश्चित दायित्वासाठी उपलब्ध करुन द्यावयाचा अतिरिक्त रु.७७९ कोटी (रुपये सातशे एकोणऐंशी कोटी फक्त) निधी याप्रमाणे एकूण रु.१४६९ कोटी (रुपये चौदाशे एकोणसत्तर कोटी फक्त) खर्चास व त्यामुळे प्रकल्पाच्या एकूण रु.५४६९ कोटी (रुपये पाच हजार चारशे एकोणसत्तर कोटी फक्त) इतक्या सुधारित किंमतीस मान्यता देण्यात येत आहे.

(२) वरीलप्रमाणे डॉलर्सच्या विनिमय दरानुसार झालेल्या रु.६९० कोटी (रुपये सहाशे नव्वद कोटी फक्त) वाढीपैकी बाह्य हिस्सा लेखाशिर्ष (२४०१ A६४६) खाली (७० टक्के) कर्ज रु.४८३ कोटी (रुपये चारशे त्र्याऐंशी कोटी फक्त) व राज्य हिस्सा लेखाशिर्ष (२४०१ A६५५) खाली (३० टक्के) रु.२०७ कोटी (रुपये दोनशे सात कोटी फक्त) याप्रमाणे निधी या प्रकल्पासाठी सन २०२३-२४ मध्ये उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच सदर प्रकल्पावर निर्माण झालेल्या निश्चित दायित्वासाठी राज्य हिस्सा लेखाशिर्ष (२४०१ A६५५) खाली अतिरिक्त रु.७७९ कोटी (रुपये सातशे एकोणऐंशी कोटी फक्त) उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(३) प्रत्यक्ष विनिमय दरानुसार व खर्चानुसार कमी किंवा अधिक परिगणना झाल्यास त्या येणाऱ्या खर्चास व त्याकरिता आवश्यक निधी उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(४) सदर निधीचे कोषागारातून आहरण व वितरणाकरिता प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी आणि वित्त विशेषज्ञ, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

(५) सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १७७/२०२३/व्यय-१, दिनांक ७ जुलै, २०२३ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

(६) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७१११२५४५५४२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANTOSH BANSIRAO KARAD

Digitally signed by SANTOSH BANSIRAO KARAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=f981d5a9fec2e5d5dc36f39695b5f0e4ff5b340cd5420df7cbaa28990d692e36, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=90BBB9D3E7E74DE43F8070E2A9A65BFD42747F1995A4F22FDC0240939AAB0835, cn=SANTOSH BANSIRAO KARAD
Date: 2023.07.11 12:55:55 +05'30'

**(संतोष कराड)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत -:**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.राज्यसभा / लोकसभा सदस्य, महाराष्ट्र राज्य
३. मा.विरोधी पक्ष नेता, विधान परिषद / विधानसभा, विधानमंडळ, मुंबई.

४. सर्व विधान परिषद / विधानसभा सदस्य, महाराष्ट्र राज्य
५. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
६. मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे सचिव मंत्रालय, मुंबई,
७. सर्व मा.मंत्री / मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
८. मा. मंत्री (कृषि), कृषि व पदुम विभाग, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
९. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
१०. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
११. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. अपर मुख्य सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई.
१४. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे.
१५. सह सचिव / उप सचिव (सर्व) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१६. सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, पुणे.
१७. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर.
१८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१९. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
२०. वित्त विभाग (व्यय १ /बियुडी १३), मंत्रालय, मुंबई,-४०० ०३२.
२१. नियोजन विभाग (कार्यासन १४३१) मंत्रालय, मुंबई,-४०० ०३२.
२२. कक्ष अधिकारी, (कार्यासन २अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२३. कार्यासन ८अे, निवड नस्ती.